महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
१५ वा मजला, नवीन प्रशासन भवन,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दूरध्वनी क्र. :-०२२-२२०२९२८२ Email ID- navnath.pokale@nic.in


क्रमांक : ठे.वि.यो.१०.२५/प्र.क्र.४४/२०२५/अर्थ-१ दिनांक : २६ मार्च, २०२५

**ज्ञापन :-**

**विषय :- दिवंगत कर्मचाऱ्यांच्या वारसांना ठेव संलग्न विमा योजनेअंतर्गत अनुज्ञेय असलेली रक्कम अदा करणेबाबत.**

**संदर्भ :-** १) शासन परिपत्रक क्र. ठेवियो १०.०८/(२४९/२००८)/अर्थ-१, दि. २६.०५.२००८.

**प्रति,**

१) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक
२) अधीक्षक अभियंता, नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड.

उपरोक्त नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, ठेव संलग्न विमा योजनेसंदर्भात विभागाने अवलंबिलेली सुधारित कार्यपध्दत संदर्भाधीन परिपत्रकान्वये निश्चित करण्यात आली आहे. या सुधारित कार्यपध्दतीच्या अनुषंगाने प्रस्तावांची पडताळणी करण्यात आली आहे.

२. सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी मागणी क्रमांक आय-२ प्रधानशीर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६० - इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०४-ठेव संलग्न विमा योजना शासकीय भविष्य निर्वाह निधी (०१)(०१) ठेव संलग्न विमा योजनेनुसार प्रदाने (अनिवार्य) (२२३५-०६०५) या लेखाशीर्षाखालील मंजुर अनुदानाच्या तरतूदीतून सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील स्तंभ-४ येथील मृत कर्मचाऱ्यांच्या वारसांना **स्तंभ - ८ प्रमाणे एकूण रू.१,८०,०००/- (रक्कम रू.एक लक्ष ऐंशी हजार फक्त) इतका निधी या ज्ञापनाव्दारे वितरीत करण्यात येत आहे.**

**३. या ज्ञापनान्वये उपलब्ध करण्यात आलेला निधी कोणत्याही परिस्थितीमध्ये दि.३१.०३.२०२५ पुर्वी खर्च करण्यात यावा. विहीत मुदतीमध्ये निधी खर्चकरण्याची जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी यांची राहील. तसेच निधी विहीत मुदतीमध्ये खर्च न झाल्यास सदर निधी समर्पित करून त्याबाबतचा योग्य तो खुलासा सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.**

४. या निधी उपलब्धता प्रमाणपत्रानुसार संबंधित कर्मचाऱ्यांच्या वारसांना वरील रक्कम अदा करण्याकरिता मंजुरीचे आदेश त्वरीत काढावेत. सदर आदेशाची प्रत शासनास व महालेखापालांच्या कार्यालयास पाठवावी. नियंत्रक अधिकाऱ्यांनी वितरीत केलेला निधी तात्काळ आहरित करण्याची कार्यवाही करावी.

५. देयक मंजुरीनंतर देयकाची रक्कम, तसेच संबंधितांना रक्कम अदा केल्याचा दिनांक इत्यादीचा तपशील शासनास त्वरीत कळवावा. आपणांस अशीही विनंती करण्यात येते की, खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखालील खर्च - मेळाचे निष्पत्ती दर्शविणारे प्रमाणपत्र (रिकन्सिलिएशन स्टेटमेंट) महालेखापालाच्या कार्यालयातून घेऊन शासनास पाठवावे.

६. यावर होणारा खर्च मागणी क्रमांक - आय- २ खालील २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६० इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०४ - ठेव संलग्न विमा योजनेनुसार प्रदाने (अनिवार्य) (२२३५-०६०५) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्याखाली संगणकीय वितरण प्रणालीव्दारे वितरीत केलेल्या तरतूदीतून भागवावा.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात येत असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०३२६१५११३३१२७ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NAVNATH BALU POKALE

Digitally signed by NAVNATH BALU POKALE
DN: CN = NAVNATH BALU POKALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2025.03.26 15:14:50 +05'30'

**( नवनाथ पोकळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**सहपत्र** - विवरणपत्र

**प्रत -** १) महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपूर
२) अ.मु.स (जसं) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आंतरवित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
५) लेखा कार्यासन, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
६) अर्थ -१ कार्यासन संग्रहार्थ.

| अ.क्रं. | नि.अ.कोड/ डी.डी.ओ कोड | कार्यालयाचे नाव | मृत कर्मचाऱ्याचे संपूर्ण नाव | पदनाम | भविष्य निर्वाह निधी लेखा क्रमांक | नाम निर्देशित व्यक्तीचे नाव व तिचे मृत कर्मचाऱ्याशी नाते | मंजूर रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | | | | | | |
| १ | I००३२ | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक | कै.बिपीन गोपाळ भालेराव | कालवा निरीक्षक | पीडब्लूएमएच - ८२६७५ | श्रीमती वर्षा बिपीन भालेराव,पत्नी | ६०,००० |
| | | | कै.राजू सयैद इनामदार | वाहन चालक | पीडब्लूएमएच - ७९३६० | श्रीमती हुसेना राजू इनामदार,पत्नी | ६०,००० |
| २ | I००५९ | अधीक्षक अभियंता, नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड | कै.शंकर विश्वनाथ इंदुरकर | कनिष्ठ अभियंता | बीआरबीएन- ३५७८१ | श्रीमती मिनाक्षी शंकर इंदुरकर ,पत्नी | ६०,००० |
| | | | | | | एकुण | १८०,००० |

NAVNATH BALU POKALE
Digitally signed by NAVNATH BALU POKALE
DN: CN = NAVNATH BALU POKALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2025.03.26 15:15:04 +05'30'

**( नवनाथ पोकळे )**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन.**